पोलीस आयुक्त, पिंपरी चिंचवड यांच्या आस्थापनेवरील १५६८ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीटीई ३६१९/प्र.क्र.१११/पोल-३**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३० सप्टेंबर, २०२१.

वाचा :-

१) शासन निर्णय, गृह विभाग क्र.अेपीओ-०८१६/प्र.क्र.१०३/पोल-३, दि.२८.०५.२०१८.
२) शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३६१९/प्र.क्र.१११/पोल-३., दि.१७.०९.२०२०.
३) शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३६१९/प्र.क्र.१११/पोल-३., दि.२६.०३.२०२१.
४) सहायक पोलीस महानिरीक्षक(नि.व स.),पोलीस महासंचालक कार्यालय,महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/२६-ब/पो.आ.पिंपरी-चिंचवड/प.टप्पा/५१/२०१९, दि.२६.०७.२०२१
५) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि. १०.०८.२०२१.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील दि.२८.०५.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये पोलीस आयुक्त, पुणे शहर व पोलीस अधीक्षक, पुणे ग्रामीण यांच्या कार्यक्षेत्राचे विभाजन करुन पिंपरी चिंचवड शहर व परिसराकरीता स्वतंत्र पोलीस आयुक्तालय निर्माण करण्यास मान्यता दिली आहे. सदर शासन शासन निर्णयानुसार पोलीस आयुक्त,पिंपरी-चिंचवड यांचे आस्थापनेवर पहिल्या टप्प्यात विविध संवर्गातील १५६८ पदे नव्याने निर्माण करण्यात आली आहेत.

उपरोक्त संदर्भ क्र.३ येथील दि.२६.०३.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये पोलीस आयुक्त,पिंपरी-चिंचवड यांचे आस्थापनेवर पहिल्या टप्प्यात नव्याने निर्माण करण्यात आलेल्या १५६८ पदांना दि.०१.०३.२०२१ ते दि.३१.०८.२०२१ या कालावधीकरिता मुदतवाढ देण्यात आली आहे. उपरोक्त संदर्भ क्र.४ येथील दि.२६.०७.२०२१ रोजीच्या पत्रान्वये सहायक पोलीस महानिरीक्षक (नि.व स.), पोलीस महासंचालक कार्यालय,महाराष्ट्र राज्य,मुंबई यांनी पोलीस आयुक्त,पिंपरी-चिंचवड यांचे आस्थापनेवर पहिल्या टप्प्यात नव्याने निर्माण करण्यात आलेल्या खालील तक्त्यात नमूद केलेल्या १५६८ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची विनंती केली आहे.

**पिंपरी- चिंचवड पोलीस आयुक्तालयासाठी पहिल्या टप्प्यामधील निर्माण करण्यात आलेली १५६८ पदांचा तपशील खालीलप्रमाणे आहे.**

| अ.क्र | कार्यकारी पदे | पदसंख्या | अकार्यकारी पदे | पदसंख्या | दवाखान्याकरिता पदे | पदसंख्या |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | पोलीस आयुक्त | १ | प्रशासकिय अधिकारी | १ | वैद्यकिय अधिकारी वर्ग-१ फिजीशियन | १ |
| २ | अपर पोलीस आयुक्त | १ | कार्यालय अधीक्षक | १ | वैद्यकिय अधिकारी वर्ग-१ एमबीबीएस | १ |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ३ | पोलीस उप आयुक्त | २ | स्वीय सहायक | १ | वैद्यकिय अधिकारी वर्ग-२ स्त्रीरोग तज्ञ | १ |
| ४ | सहायक पोलीस आयुक्त | ७ | कनिष्ठ श्रेणी लघुलेखक | १ | परिचारीका | ४ |
| ५ | पोलीस निरीक्षक | २४ | लेखा अधिकारी | १ | मिश्रक | १ |
| ६ | सहायक पोलीस निरीक्षक | ३६ | सहायक लेखा अधिकारी | १ | औषध निर्माण अधिकारी | १ |
| ७ | पोलीस उपनिरीक्षक | ६५ | विधी अधिकारी | २ | प्रयोगशाळा तंत्रज्ञ (वैज्ञानिक सहायक) | १ |
| ८ | सहायक पोलीस उपनिरीक्षक | ८८ | प्रमुख लिपीक | ४ | वैज्ञानिक सहायक | १ |
| ९ | पोलीस हवालदार | १७४ | वरिष्ठ लिपीक | ९ | क्ष-किरण तंत्रज्ञ | १ |
| १० | पोलीस नाईक | ३३६ | कनिष्ठ लिपीक | २० | ड्रेसर | १ |
| ११ | पोलीस शिपाई | ७४४ | फोटोग्राफर | ० | वॉर्ड बॉय | ०२ |
| १२ | | | फिंगर प्रिंट एक्स्पर्ट | १ | आया | १ |
| १३ | | | मोची | १ | चपराशी | १ |
| १४ | | | हेडकुक | १ | सफाईगार | २ |
| १५ | | | सहायक हेड कुक | २ | कनिष्ठ श्रेणी लिपीक | १ |
| १६ | | | मेस सर्व्हंट | ३ | | |
| १७ | | | माळी | १ | | |
| १८ | | | शिंपी | १ | | |
| १९ | | | न्हावी | १ | | |
| २० | | | कार्यालयीन शिपाई | ६ | | |
| २१ | | | सफाईगार | १२ | | |
| **एकूण** | | १४७८ | | ७० | | २० |

२. आता पोलीस आयुक्त, पिंपरी-चिंचवड यांच्या आस्थापनेवरील वर तक्त्यात नमूद केलेल्या एकूण १५६८ अस्थायी पदांना **दिनांक ०१ सप्टेंबर, २०२१ ते दिनांक २८ फेब्रुवारी, २०२२** पर्यंत खालील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

१) सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त पदे वगळून उर्वरित पदांना मुदतवाढ देण्यात यावी. तसेच पदे ज्या कारणास्तव ज्या अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूर केली आहेत, त्याचे पालन करण्यात यावे.

२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तिय सुधारणा-१, दिनांक १० सप्टेंबर २००१ आणि क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२/२००४/वित्तिय सुधारणा-१, दिनांक १९ ऑगस्ट २००४ नुसार पदांच्या आढाव्याची कार्यवाही तातडीने पूर्ण करुन कार्यालयाचा सुधारित आकृतीबंध उच्चस्तरीय सचिव समितीकडून अंतिमत: मान्य करुन घेण्याबाबतचा प्रस्ताव तात्काळ शासनास सादर करण्यात यावा.

३) आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेताना शासनाच्या कार्यपद्धतीतील तंत्रज्ञानाचा वाढता वापर, काळानुरुप शासनाच्या मनुष्यबळात बदल व मनुष्यबळाचा परिणामकारक वापराची आवश्यकता या बाबींचा विचार करुन अनावश्यक पदे कमी करण्याचाही विचार करावा.

४) सदर कालावधीमध्ये कोणत्याही परिस्थितीत पदांचा आढावा उच्चस्तरीय समितीसमोर ठेवून मान्यता घेण्याबाबत वित्त विभागाने संदर्भाधिन क्र.५ येथील दिनांक १०.०८.२०२१ च्या शासन निर्णयानुसार सूचित केलेले आहे. ही बाब विचारात घेता दिनांक २८.०२.२०२२ अखेर पर्यंत पदांच्या आढाव्याची कार्यवाही पूर्ण न झाल्यास, उपरोक्त अस्थायी पदांना त्या पुढील कालावधीसाठी मुदतवाढ न मिळाल्यास व त्यामुळे अधिकारी/ कर्मचारी यांच्या वेतन व भत्याचा प्रश्न निर्माण झाल्यास याबाबतची सर्वस्वी जबाबदारी संबंधित कार्यालयाची राहिल.

३. यासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक बी-१, २०५५-पोलीस, (००) १०९ जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस बल (२०५५०१६८), मागणी क्रमांक बी-१, २०५५-पोलीस, (००) १०९ जिल्हा पोलीस (००) (०२) जिल्हा हॉस्पीटल (२०५५०१७७), मागणी क्रमांक बी-१, २०५५-पोलीस, (००) ११० ग्राम पोलीस (००) (०१) पोलीस पाटील व मेवास पोलीस (२०५५०२२१), मागणी क्रमांक बी-१, २०५५-पोलीस, (००) ००१ संचालन व प्रशासन (००) (४१) गुप्तसेवा खर्च (२०५५००१४), मागणी क्रमांक बी-१, २०५५-पोलीस, (००) ००१ संचालन व प्रशासन (००) (०२) पोलीसांची भरती (२०५५०६६९), मागणी क्रमांक बी-१, २०५५-पोलीस, (००) १०९ जिल्हा पोलीस (००) (०५) कोंडवाडे (२०५५०२२१) " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो **सन २०२१-२२** या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १०.०८.२०२१ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

५.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९३०१९०७१६०६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rupali Sanjog Kabare

Digitally signed by Rupali Sanjog Kabare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=825ec39543f0d33deccec30f6ca54b1adc430443efec55f07e98dc173423779d, serialNumber=5cb43a03d973ff96aabbf02a74864a4681399fe663d8fbde0441a596beb3acdd, cn=Rupali Sanjog Kabare
Date: 2021.09.30 19:08:07 +05'30'

**( रूपाली कबरे )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) पोलीस आयुक्त, पिंपरी-चिंचवड.
३) विशेष पोलीस महानिरीक्षक, कोल्हापूर परिक्षेत्र, कोल्हापूर
४) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई .
५) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
८) जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे
९) वित्त विभाग (व्यय-७) / वित्तिय सुधारणा-१.
१०) निवड नस्ती.